**किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत राज्यात खरेदी करण्यात येत असलेल्या धानाची तसेच धानापासून तयार होणाऱ्या तांदळाची (सीएमआर) त्रयस्थ संस्थेकडून गुणवत्ता तपासणी करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२६२१/प्र.क्र.२३६/ना.पु.२९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २३ डिसेंबर, २०२१.

**वाचा -**

१) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२६२१/ प्र.क्र.१३८/ना.पु.२९, दिनांक ३० सप्टेंबर, २०२१.

२) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन परिपत्रक क्रमांकः धानभ-१२२१/ प्र.क्र.१५७/ना.पु.२९, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना -**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून शेतकऱ्यांना हमी भावापेक्षा कमी किंमतीने (डिस्ट्रेस सेल) धान्य विकावे लागू नये, म्हणून ही योजना राबविण्यात येते. त्यासाठी राज्य शासनाने नियुक्त केलेल्या अभिकर्ता संस्थांमार्फत (बिगर आदिवासी क्षेत्रात महाराष्ट्र स्टेट को-ऑप. मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व आदिवासी क्षेत्रात, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक) राज्यात एफ.ए.क्यु. (Fair average quality) दर्जाच्या धान व भरडधान्याची खरेदी करण्यात येते. वरील योजनेंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई अभिकर्ता संस्थांमार्फत मिलर्सकडून करुन घेऊन प्राप्त होणारा सी.एम.आर. (Custom milled rice) (कच्चा तांदूळ) भारतीय अन्न महामंडळाकडे जमा करण्यात येत होता. केंद्र शासनाने "धान" या धान्यासाठी राज्यात "विकेंद्रीत खरेदी योजना" (DCPS) लागू करणेबाबत केलेली शिफारस विचारात घेऊन हंगाम २०१६-१७ पासून विकेंद्रीत खरेदी योजना संपूर्ण राज्यात राबविण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे.

सदर योजनेंतर्गत खरेदी करण्यात आलेले धान व धानाची भरडाई करुन केंद्र शासनाच्या निकषांनुसार सीएमआर (तांदुळ) तयार होतो अथवा नाही याबाबत गुणवत्ता तपासणी काटेकोरपणे होणे आवश्यक आहे. भारतीय अन्न माहामंडळ व राज्य शासन यांच्या संयुक्त पहाणी नंतरही गुणवत्ता नियंत्रणाबाबत बऱ्याच तक्रारी प्राप्त होत आहेत. तेव्हा गुणवत्ता नियंत्रणाबाबत अडचणी निर्माण होऊ नयेत याद्दष्टीने धानाचे तसेच सीएमआरचे (तांदळाचे) गुणवत्ता नियंत्रण प्रचलित यंत्रणेसोबतच त्रयस्थ संस्थेमार्फत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

## शासन निर्णय-

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत विकेंद्रीत धान खरेदी योजनेमध्ये धान उत्पादक जिल्ह्यांमध्ये खरेदी करण्यात आलेल्या धानाची तसेच धानाची भरडाई करुन प्राप्त होणाऱ्या सीएमआरच्या गुणवत्ता तपासणीकरिता शासनाने राबविलेल्या ऑनलाईन खुल्या निविदाप्रक्रीयेद्वारे **"ॲगनेक्स्ट टेक्नॉलॉजिस् प्रायव्हेट लिमिटेड"** ("Agnext Technologies Pvt. Ltd") या संस्थेची निविदा अंतिम करण्यात आली असून, या शासन निर्णयान्वये सदर संस्थेची धानाची तसेच धानाची भरडाई करुन प्राप्त होणाऱ्या सीएमआरची केंद्र शासनाने नमूद केलेल्या निकषांनुसार गुणवत्ता तपासणी करण्याकरिता पणन हंगाम २०२१-२२ करिता निवड करण्यात येत आहे.

२. त्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यकक्षा निश्चित करण्यात येत आहे:-

I. संस्थेने किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत विकेंद्रीत धान खरेदी योजनेमध्ये धान उत्पादक जिल्ह्यांत खरेदी करण्यात आलेल्या धानाची तसेच धानाची भरडाई करुन प्राप्त होणाऱ्या सीएमआरची केंद्र शासनाने नमूद केलेल्या निकषांनुसार गुणवत्ता तपासणी करावी.

II. सदर तपासणीकरिता संस्थेने सीएमआरच्या प्रत्येक लॉटमधून (१ लॉट = २७ मे.टन) यादृच्छिक पद्धतीने (random sampling) नमुने घेऊन तपासणी करावी.

III. सदर तपासणी अहवाल/ गुणवत्ता प्रमाणपत्र संस्थेने विहित कालावधीत शासनाचे प्रतिनिधी म्हणून जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे गोपनीय पद्धतीने पाठवावे. सदर अहवाल व शासनाची विहित यंत्रणा यांच्या अहवालांमध्ये तफावत आढळल्यास जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी आवश्यक कार्यवाही करुन त्याबाबत शासनास तात्काळ अवगत करावे.

IV. सदर तपासणी संस्थेने आवश्यकता भासल्यास शासनाला गुणवत्ता तपासणीबाबतचे तांत्रिक सहाय्य पुरवावे.

V. सदर संस्थेने त्यांच्या संस्थेचे गुणवत्ता नियंत्रक विनाविलंब उपलब्ध होतील याबाबत दक्षता घ्यावी.

VI. त्यासाठी शासन व "ॲगनेक्स्ट टेक्नॉलॉजिस् प्रायव्हेट लिमिटेड" यांच्यादरम्यान होणाऱ्या करारातील अटी व शर्तीनुसार सदर संस्थेने कार्यवाही करावयाची आहे.

३. सदरचा खर्च विभागाच्या मागणी क्र. एम-४, मुख्य लेखा शीर्ष ४४०८, अन्न, साठवण व वखार यांवरील भांडवली खर्च ०१-अन्न, १०१- प्रापण व पुरवठा, (०२) प्रापण व वितरण व किंमत नियंत्रण (०२) (१३) मुंबई शहर किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेखालील भरडधान्याची/ धानावरील अनुषांगिक खर्च (अनिवार्य) (४४०८ ०३९१) ५०, इतर खर्च या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२३१३०४२४०९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0aa909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA4851335010591835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2021.12.23 13:05:39 +05'30'

**( सुधीर तुंगार )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव.
५. मा. मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव.
६. मा. मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
७. मा. विरोधी पक्ष नेते (विधानसभा, विधानपरिषद)
८. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव.
९. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
११.अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१३.अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.अपर मुख्य सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
१५. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६.अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१७.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., कनमूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रीट,मुंबई- ४०० ००९,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, आदिवासी विकास भवन, २ रा माळा, राम गणेश गडकरी चौक, जुना आग्रा रोड,नाशिक-२,
१९. सर्व विभागीय आयुक्त.
२०. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गो/वा),मुंबई,
२१. सर्व जिल्हाधिकारी,

२२.सर्व उप आयुक्त (पुरवठा),

२३.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,

२४.सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,

२५.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,

२६.उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.

२७.सहसचिव /सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,

२८. सर व्यवस्थापक,(महा.) भारतीय अन्न महामंडळ,५ वा माळा, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरीवली पूर्व मुंबई-४०० ०६६.

२९.उपाध्यक्ष (वित्त), ॲगनेक्स्ट टेक्नॉलॉजिस् प्रायव्हेट लिमिटेड, ६ वा मजला, एसटीपीआय इनक्युबेशन सेंटर, फेज-८अ, मोहाली, पंजाब -१६००७१.

३०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),

३१.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)

३२.मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),

३३.सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य

३४.निवड नस्ती (नापु-२९).